जिल्हा शल्य चिकीत्सक संवर्गातील अधिकारी यांच्या बदलीने पदस्थापनेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन आदेश क्रमांकः बदली-२०२३/प्र.क्र.२१९/सेवा-२**
गो.ते.रुग्णालय इमारत, १० मजला, ए विंग,
मंत्रालय, मुंबई -४०० ००१
दिनांक : २८ ऑगस्ट, २०२३

**शासन आदेश -**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४ (४) (दोन) आणि कलम ६ मधील तरतुदीनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने जिल्हा आरोग्य अधिकारी संवर्गातील (वेतनस्तर एस-२३ : ६७७००-२०८७००) अधिकाऱ्यांची खालीलप्रमाणे बदलीने पदस्थापना करण्यात येत आहे.:-

| क्र | अधिकाऱ्याचे नाव व सध्याची पदस्थापना | बदलीने पदस्थापना |
|---|---|---|
| १. | **डॉ.निलीमा पाटील,**<br>वै.अ., ग्रा.रु., सोळांकूर जि.कोल्हापूर | **वैद्यकीय अधिक्षक, उपजिल्हा रुग्णालय, कसबा बावडा, जि.कोल्हापूर**<br>(रिक्त पदी) (विनंतीनुसार) |

२. बदली करण्यात आलेल्या अधिकाऱ्यास त्याच्या नवीन पदस्थापनेच्या ठिकाणी हजर होण्याकरीता तात्काळ कार्यमुक्त करण्यात यावे आणि संबंधित अधिकाऱ्याने त्यांना दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी त्वरीत हजर होऊन त्याबाबतचा अहवाल संचालक, आरोग्य सेवा मुंबई यांना व शासनास सादर करावा.

३. बदली झालेल्या अधिकाऱ्यास कोणत्याही प्रकारची रजा मंजूर करण्यात येऊ नये, अन्यथा रजा मंजूर करणाऱ्या सक्षम प्राधिकाऱ्याविरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल.

४. बदली झालेल्या अधिकाऱ्याने त्यांना कार्यमुक्त केल्यानंतर, अनुज्ञेय पदग्रहण अवधीत नवीन पदस्थापनेवर रुजू व्हावे, संबंधित अधिकाऱ्याने या कालमर्यादेचे पालन न केल्यास आणि पदस्थापनेच्या ठिकाणी हजर न होता परस्पर गैरहजर राहिल्यास, त्यांची अनुपस्थिती “अनधिकृत अनुपस्थिती” म्हणून समजण्यात येईल व पर्यायाने त्यांच्या सेवेत खंड होईल याची जाणीव संबंधितांना करुन देण्यात येत आहे.

५. संबंधित अधिकारी त्यांच्या पदस्थापनेच्या ठिकाणी हजर न झाल्यास त्यांचेविरुध्द आयुक्तालयाने वेळीच प्रशासकीय कारवाई सुरु करावी व आवश्यकतेनुसार प्रस्ताव शासनाच्या मान्यतेसाठी सादर करावा. या प्रकरणी वेळोवेळी शासनास अवगत करावे व अनुपालन अहवाल शासनास विहित कालमर्यादेत सादर करावा.

६. बदलीच्या आदेशात बदल करुन घेण्यासाठी संबंधित अधिकाऱ्याने प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास ते शिस्तभंग विषयक कारवाई करण्यास पात्र ठरतील.

७. सदर आदेश तात्काळ अंमलात येतील.

८.    सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०८२८१३१८२०३६१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VASANT PANDURANG GAIKWAD

Digitally signed by VASANT PANDURANG GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=6762a1c7f462bd961625d44d6971dc2c9f06f3437a7f750c414e77ec2b7f466d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7C71DE18A037CE1808BB4E1BA5462D93EB69C5FEB96700EDA8ADF1B3C9C753F8, cn=VASANT PANDURANG GAIKWAD
Date: 2023.08.28 16:47:02 +05'30'

(व.पां.गायकवाड)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
२) संचालक, आरोग्य सेवा (१/२), मुंबई/पुणे.
३) सहसंचालक, आरोग्य सेवा (सर्व).
४) उपसंचालक, आरोग्य सेवा, कोल्हापूर.
५) महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र -१ , मुंबई /महाराष्ट्र -२, नागपूर.
६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र -१ , मुंबई /महाराष्ट्र -२, नागपूर.
७) जिल्हा कोषागार अधिकारी, कोल्हापूर.
८) मा.मंत्री (आरोग्य) / मा.राज्यमंत्री (आरोग्य) यांचे खाजगी सचिव
९) सर्व सह सचिव/उप सचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, सा. आ. विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) अपर मुख्य सचिव/सचिव-२, सा. आ. विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक
११) सर्व संबंधित अधिकारी (संचालक, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांचेमार्फत)
१२) निवड नस्ती (सेवा - २)